**परिवहन आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवर अपर परिवहन आयुक्त हे पद निर्माण करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**गृह विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक: एमव्हीडी-१२०३/सीआर-३२१/परि-४,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक : २० नोव्हेंबर, २००३.**

वाचा : परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.संकिर्ण-४६०३/का.८(१)/ कॅबिनेट/ जा.क्र.५००९, दिनांक- ११/४/२००३.

<u>शासन निर्णय</u> : मोटार वाहनांची दिवसेंदिवस वाढत असलेली संख्या लक्षात घेता तसेच मोटार वाहन कराची जास्तीत जास्त वसुली होण्याच्या दृष्टीने व त्यावर योग्य नियंत्रण ठेवण्याकरीता परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई येथे अपर परिवहन आयुक्ताचे एक पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. मोटार वाहन विभागाचे बळकटीकरण करण्याकरीता परिवहन आयुक्त कार्यालयाच्या आस्थापनेवर रू. १४,३००-४००- १८,३०० या वेतनश्रेणीत अपर परिवहन आयुक्ताचे एक पद निर्माण करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर पद हे मोटार वाहन विभागातील अधिकाऱ्यांमधून पदोन्नतीने भरण्यात येईल.

२. मागणी क्र. बी- ३ "२०४१ वाहनावरील कर ००१ संचालन व प्रशासन -(०२) प्रादेशिक कार्यालये-(०२) (०१) प्रादेशिक कार्यालये-दत्तमत (योजनेतर ) (२०४१००३६)" या लेखाशीर्षाखाली शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक आकनि ११.०३/६८ /अर्थसंकल्प-१०, दि. १ .१०.२००३ अन्वये ३ प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाची कार्यलये व ३ उप प्रादेशिक परिवहन अधिकारी दर्जाची कार्यालये सुरु करणे, २० वायुवेग पथके सुरु करणे व ६ सीमा तपासणी नाके सुरु करणे याकरिता आकस्मिकता निधीतून रूपये १,००,०००/- (रूपये एक लाख फक्त) अग्रिम मंजूर झाला आहे. अपर परिवहन आयुक्त या पदाकरीता येणारा खर्च हा "मागणी क्र. बी- ३ २०४१ वाहनावरील कर ००१ संचालन व प्रशासन -(०२) प्रादेशिक कार्यालये-(०२) (०१) प्रादेशिक कार्यालये-दत्तमत (योजनेतर ) (२०४१००३६)" या लेखाशीर्षाखाली मंजूर झालेल्या उपरोल्लेखित अग्रिमातून

"मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनावरील कर, ००१ संचालन व प्रशासन-(०१)आस्थापना-(०१)(०१) परिवहन आयुक्त-दत्तमत (योजनेतर) (२०४१००१८)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यास शासन मान्यता देत आहे.

३. सदर पुनर्विनियोजनाचे आदेश वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-तीन, अनुक्रमांक १, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका परिच्छेद क्रमांक १६२, १६३ व १६४ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. यासंबंधीची देयके सादर करताना त्यावर लाल शाईने सदर खर्च आकस्मिकता निधीतून करण्यात आला आहे अशी नोंद घेण्यात यावी. व सदर प्रकरणी पुरक अनुदान प्राप्त झाल्यावर तो मागणी क्र.बी-३, "२०४१ वाहनावरील कर ००१ संचालन व प्रशासन -(०१) आस्थापना-(०१)(०१) परिवहन आयुक्त-(दत्तमत)(योजनेतर ) (२०४१००१८)" या लेखाशीर्षाखाली अंतिमतः खर्ची टाकण्यात यावा.

३. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी वरील मंजूरीप्रमाणे आकस्मिकता निधी अग्रिम रकमेतून खर्च करण्यासाठी देयके सादर करण्यासंदर्भात पुढील सूचना काटेकोरपणे पाळण्याबाबत कळवावे.

१) आकस्मिकता निधीतून खर्च करण्यासाठी आहरण व संवितरण अधिका-याकडे रक्कम सुपूर्द करण्यासंबंधीच्या आदेशात आगाऊ रक्कमेतून खर्च करताना सादर करण्यात येणा-या देयकावर "आकस्मिकता निधी अग्रिम, शासन ज्ञापन, वित्त विभाग क्रमांक: आकनि-११.०३/६८/अर्थसंकल्प-१०, दिनांक १ ऑक्टोबर, २००३ संगणक सांकेतांक ८०००-०६८-७ अन्वये मंजूर" असे लाल शाईने लिहावे अशी सूचना आदेशात अंतर्भूत करावी व ही सूचना लाल शाईने अधोरेखित करावी.

२) आकस्मिकता निधी अग्रिम रकमेतून खर्च करण्यासाठी वेगळी देयके सादर करावीत.

३) देयकावर जोडलेल्या संगणक चिठ्ठीवर अर्थसंकल्प शीर्षाचा कोड नंबर लिहिण्यात यावा.

४) वित्त विभाग परिपत्रक क्रमांक: सीएनएफ-१०८६/१५३/अर्थ-३, दिनांक २८.८.१९८६ अन्वये आकस्मिकता मिधीमधील आगाऊ रकमेबाबत दिलेल्या आदेशाचे काटेकोरपणे पालन करावे.

५) आकस्मिकता निधीतून अग्रिमातून करावयाच्या खर्चासंबंधी. देयके काढताना संगणक सांकेताकचा वापर करावा.

४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी वरील मंजूरीप्रमाणे आकस्मिकता निधीतून अग्रीम रक्कम खर्च करताना ज्या कारणासाठी तरतूद उपलब्ध करुन दिलेली आहे त्याच कारणासाठी पूर्णपणे खर्च करावी ते याकरिता पूर्णपणे जबाबदार राहतील. तसेच सदरहू अग्रिमातून प्रत्यक्ष खर्च केल्याची माहिती त्यांनी शासनास दिनांक १५.१२.२००३ पूर्वी अवगत करावी.

६. हा निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र सीआर ११२९/२००३/व्यय-८, दिनांक १५.११.२००३ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

प्र.कृ. सगदेव

( प्र.कृ. सगदेव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन,
गृह विभाग .

प्रति,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी,
महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल, लेखा अनुज्ञेयता, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, ५ वा मजला,
नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
वित्त विभाग, (व्यय-८/अर्थसंकल्प-३ /अर्थसंकल्प-१०), मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अर्थसंकल्प-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.